**राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत राज्यातील राज्यातील गोंदिया व चंद्रपूर जिल्हयातील कृषि उत्पन्न बाजार समित्यांच्या पायाभूत सुविधा विकासाच्या प्रकल्पांना प्रशासकीय व तांत्रिक मान्यता देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
शासन निर्णय क्रमांक राकृवियो ०८१०/प्र.क्र.१९३/२१-स,
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक : ०५ /०८/२०१०

**वाचा :** १. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे यांचेकडील पत्र जा.क्र.कृपमं/प्रकल्प/आरकेव्हीवाय/१५ प्रस्ताव/१०६५/२०१०, दि. २३.०६.२०१०.

२ कृषि व पदुम विभागाचे पत्र क्रमांक राकृवि-२०१०/प्र.क्र.५२/राकृवियो कक्ष, दिनांक२/८/२०१०.

**प्रस्तावना :**

देशातील कृषि क्षेत्राचा विकास ११ व्या पंचवार्षिक योजनेदरम्यान किमान ४ % दराने घडवून आणण्याकरिता तसेच कृषि क्षेत्रातील विविध नाविन्यपूर्ण उपक्रमांना चालना देता यावी त्याचप्रमाणे दिर्घकालीन लाभ देणा-या पायाभूत सुविधांचा विकास घडवून आणण्याकरिता केंद्र शासन राज्य शासनामार्फत १००% केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषि विकास योजना राबवित आहे.

केंद्र शासनाच्या निर्देशाप्रमाणे राज्यातील गडचिरोली व गोंदिया या नक्षलग्रस्त व भंडारा व चंद्रपूर या लगतच्या जिल्हयातील कृषि उत्पन्न बाजार समित्यांच्या पायाभूत सुविधा विकासाबाबतचे प्रकल्प हाती घेण्यात येत आहेत. सन २०१०-११ मध्ये गोंदिया जिल्हयातील ५ व चंद्रपूर जिल्हयातील ४ कृषि उत्पन्न बाजार समित्यांच्या प्रकल्पांची प्रशासकीय व तांत्रिक छाननी करुन विहित नमुन्यात राज्यस्तरीय सुकाणू समितीपुढे प्रकल्प मान्यतेस्तव सादर करण्याकरिता पणन मंडळाकडून राज्य शासनास प्राप्त झाले आहेत. केंद्र शासनाचे निर्देश, तसेच महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळाने खालील प्रकल्पांच्या प्रस्तावांची तांत्रिक व प्रशासकीय छाननी करुन शासनास सादर केले असल्याचे लक्षात घेता शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णयः-**

१. राज्यातील गोंदिया व चंद्रपूर जिल्हयातील पुढील कृषि उत्पन्न बाजार समित्यांच्या पायाभूत सुविधा विकासाच्या प्रकल्पांना पणन विभागातर्फे पुढील प्रकल्प राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत प्रकल्प किंमतीच्या ७५% अनुदानाकरिता प्रस्तावित करण्यात येत आहेत.

**(रुपये लाखात)**

| अ.क्र. | प्रकल्पाचे नाव | प्रकल्प खर्च | अनुदानाचा प्रस्ताव |
|---|---|---|---|
| १ | गोंदीया जिल्हयातील कृषि उत्पन्न बाजार समित्यांमध्ये आवश्यक पणन विषयक व मुलभूत सुविधांची निर्मिती. (कृ.उ.बा.स. गोंदिया, गोरेगाव, तिरोडा, आमगाव, अर्जुनी मोरगांव) | २,३८४.७६ | १,७८८.५७ (प्रकल्प किंमतीच्या ७५ टक्के) |
| 2 | चंद्रपूर जिल्हयातील कृषि उत्पन्न बाजार समित्यांमध्ये आवश्यक पणन विषयक व मुलभूत सुविधांची निर्मिती. (कृ.उ.बा.स. कोरपना, सिंदेवाही, राजुरा, सावली, पोभुर्णा, ) | १,०७९.३१ | ८०९.४८ (प्रकल्प किंमतीच्या ७५ टक्के) |

२. अनुक्रमांक १ येथील नमूद सर्व प्रकल्पांना या विभागाची तांत्रिक व प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

३. सदरच्या प्रकल्पांना विभागाची केवळ प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान करण्यात येत असून सदर प्रकल्पांना राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राज्यस्तरिय प्रकल्प मंजूरी समितीची मान्यता मिळणे आवश्यक असून तद्नंतरच या प्रकल्पांची अंमलबजावणी करण्यात येईल.

४. विभागाने अर्थसहाय्याचा उपरोक्त प्रस्ताव मान्य केला असला तरी सदर प्रकल्पांकरिता राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समिती अर्थसहाय्याच्या जो आराखडा मंजूर करेल त्याच धर्तीवर प्रकल्पांची अंमलबजावणी करण्यात येईल.

५. सदरच्या प्रकल्पांच्या अंमलबजावणीसाठी महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे यांची नोडल एजन्सी म्हणून नेमणूक करण्यात येत असून या योजनेच्या अंमलबजावणी विषयक मार्गदर्शक सुचना राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या मान्यतेनंतर निर्गमित करण्यात येतील.

सदर शासन निर्णय शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००८०५१८३२४४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही /-
(श्रीकांत चं. आंडगे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन,
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.

**प्रत :**

१ अपर मुख्य सचिव(कृषि), मंत्रालय,मुंबई

२ प्रधान सचिव (सहकार व पणन), मंत्रालय, मुंबई-३२.

३ प्रधान सचिव (नियोजन), मंत्रालय, मुंबई-३२.
४ प्रधान सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई-३२
५ प्रधान सचिव (जलसंधारण), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६ प्रधान सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७ सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८ आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९ कृषि पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१० कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, गुलटेकडी, मार्केटयार्ड, पुणे.
११ सर्व जिल्हा उप निबंधक, सहकारी संस्था,
१२ निवड नस्ती